**व्यावसायिक पदवी अभ्यासक्रमाच्या प्रवेशासाठी**
**सुधारित प्रवेश अर्हता निश्चित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०११/(१४५/२०११)/तांशि-४,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ५ जुलै, २०११.

संदर्भ : (१) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. २अ/एडीएम/ २०११/८३७, दिनांक ५ जुलै, २०११
(२) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेची अधिसूचना क्र. १-एमएस/ एआयसीटीई/२०११, दिनांक ४ जुलै, २०११.

**प्रस्तावना** : अभियांत्रिकी, वास्तुशास्त्र, औषधनिर्माणशास्त्र, हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड कॅटरिंग टेक्नॉलॉजी या पदवी अभ्यासक्रमांसाठी इच्छुक विद्यार्थ्यास इयत्ता १२वी मध्ये किमान गुण प्राप्त करण्याची अट संपादित करण्यात आली होती. त्यानुसार सर्वसाधारण प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी फिजिक्स, केमिस्ट्री आणि मॅथेमॅटिक्स या विषयांत सरासरी ५० टक्के गुण व राखीव प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी ४५ टक्के गुण इयत्ता १२ वी मध्ये संबंधित विद्यार्थ्याने संपादित करणे आवश्यक होते. दरम्यानच्या कालावधीत अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने त्यांच्या दिनांक ४ जुलै, २०११ च्या अधिसूचनेन्वये अभियांत्रिकी, वास्तुशास्त्र, औषधनिर्माणशास्त्र, हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड कॅटरिंग टेक्नॉलॉजी या व्यावसायिक पदवी अभ्यासक्रमांसाठी इयत्ता १२वी मध्ये संपादित करावयाची किमान गुणांची मर्यादा सर्वसाधारण विद्यार्थ्यांकरिता ४५ टक्के व राखीव प्रवर्गातील विद्यार्थ्यांकरिता ४० टक्के एवढी सुनिश्चित केली आहे. त्यानुसार राज्यातील अधिकाधिक विद्यार्थ्यांना व्यावसायिक अभ्यासक्रमांमध्ये प्रवेश घेणे सुलभ व्हावे, म्हणून या संदर्भात शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** : शैक्षणिक वर्ष २०११-१२ पासून अभियांत्रिकी, वास्तुशास्त्र, औषधनिर्माणशास्त्र, हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड कॅटरिंग टेक्नॉलॉजी या व्यावसायिक पदवी अभ्यासक्रमांसाठी प्रवेशेच्छुक विद्यार्थ्याने इयत्ता १२वी मध्ये फिजिक्स, केमिस्ट्री आणि मॅथेमॅटिक्स या विषयांत सरासरी संपादित करावयाचे किमान गुण खालीलप्रमाणे विहित करण्यात येत आहेत:-

अ) सर्वसाधारण प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी :- ४५ टक्के
ब) राखीव प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी :- ४० टक्के

२. सदरहू आदेशाची अंमलबजावणी शैक्षणिक वर्ष २०११-१२ पासून करण्यात यावी.
महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(भ. सं. वानखेडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
संचालक (तंत्रशिक्षण), तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
निवडनस्ती/तांशि-४
C:\Documents and Settings\v\My Documents\TE v\GR\Qualification.doc